आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षात महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेसाठी निधी वितरण

लेखाशीर्ष-२२१० जी २८९

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/ प्र.क्र.५/कार्यासन-६**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख : ०३ डिसेंबर,२०२१.

**वाचा :-**

१) वि. वि, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१ /प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.

२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.०५/कार्यासन-६, दि.२८.७.२०२१, दि.३०.०९.२०२१ व दि.११.१०.२०२१.

३) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र.पूरक-२०२१/प्र.क्र.१३५/आरोग्य-६.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य या योजनेअंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गातील लाभार्थ्यांचा दि.०१.१०.२०२१ ते दि.३१.१२.२०२१ या त्रैमासिक कालावधीचा आगाऊ विमा हप्ता पूर्णपणे प्रदान करण्यासाठी एकूण रु.२५०३.२१२१७ लाख (१०० % मर्यादेत) या निधी मागणीचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता. या प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संदर्भाधीन क्र.२ अन्वये रु.२२९६.७८ लाख इतका निधी वितरीत करण्यात आला होता. तथापि एकूण निधी मागणीपैकी उर्वरीत रु.२०६.४२४३४ लाख इतका निधी वितरणासाठी उपलब्ध करण्याबाबत संदर्भाधीन क्र.३ अन्वये सार्वजनिक आरोग्य विभागाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावास अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदींमधून क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य या मुख्य लेखाशीर्षाखाली महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गातील लाभार्थ्यांचा दि.०१.१०.२०२१ ते दि.३१.१२.२०२१ या त्रैमासिक कालावधीचा आगाऊ विमा हप्ता पूर्णपणे प्रदान करण्यासाठी उर्वरीत निधी रु.२०६.४२४३४ लाख वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव** | **लेखाशीर्ष** | **बाब** | **सन २०२०-२१ मधील अर्थसंकल्पीय तरतूद** | **आतापर्यंत वितरीत करण्यात आलेली तरतूद** | **सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद** |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना | २२१० जी २८९ | ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) | ८०००.०० | ४९११.५६ | २०६.४२४३४ |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.२०६.४२४३४ लाख (अक्षरी रुपये दोन कोटी सहा लाख बेचाळीस हजार चारशे चौतीस फक्त)** इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.८१/प्र.स.(वि.सु.), दि.२४.११.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२४१५३९५१८४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2021.12.03 18:22:42 +05'30'

**( रविंद्र दि. औटे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. वित्त विभाग ( अर्थसंकल्प-१९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग